राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान (RGSA)
योजनेअंतर्गत सन २०२३-२४ या वित्तीय
वर्षाकरिता केंद्र शासनाकडून राज्य
हिश्याकरीता प्राप्त झालेल्या निधीच्या प्रमाणात
राज्य हिस्सा वितरित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः राग्रास्व- २०२३/प्र. क्र. ५३/०२/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०५ जुलै, २०२३

वाचा :-

१. शासन निर्णय क्रमांक : राग्रास्वअ- २०२२ /प्र.क्र.४०/आस्था-१५, दिनांक १६ सप्टेंबर, २०२२.
२. वित्त विभागाकडील शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३.
३. शासन निर्णय क्रमांक : राग्रास्वअ- २०२२ /प्र.क्र.५३/आस्था-१५, दिनांक २१ मार्च, २०२३
४. पंचायती राज मंत्रालय, भारत सरकार यांचे आदेश क्र. के-११०११/७/२०२३-सीबी, दि.१४ जून, २०२३.
५. **शासन निर्णय क्रमांक** : राग्रास्वअ- २०२२ /प्र.क्र.६/आस्था-१५, दिनांक १३ मार्च, २०२३
६. शासन निर्णय क्र. राग्रास्व-२०२२/प्र.क्र.२३/०१/आस्था-१५, दि. ०५ जुलै, २०२३

प्रस्तावना :-

केंद्र शासनाने पंचायती राज व्यवस्थेच्या बळकटीकरणासाठी **"राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान"** या योजनेचे पुनर्गठन करुन **"राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान"** ही योजना सन २०१८-१९ ते सन २०२१-२२ या कालावधीत राबविली आहे. सदर योजनेचा मुळ ढाचा न बदलता सन २०२२-२३ पासून **"पुनर्रचित राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान"** ही योजना ग्रामविकास विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दि.१६.०९.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये लागू केली आहे. सदर योजना केंद्र शासन पुरस्कृत असून या योजनेच्या निधीचे प्रमाण हे केंद्र हिस्सा ६०% व राज्य हिस्सा ४०% असे आहे.

२. सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान योजनेसाठी रु.३३७.२१ कोटी (रुपये तीनशे सदोतीस कोटी एकवीस लक्ष फक्त) एवढ्या रकमेच्या वार्षिक कृती आराखड्यास केंद्र शासनाने मंजूरी दिलेली आहे. त्या अनुषंगाने पंचायती राज मंत्रालय, भारत सरकार यांच्या संदर्भ क्र.४ येथील दिनांक १४ जून, २०२३ रोजीच्या पत्रान्वये, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान योजनेंतर्गत राज्यास सन२०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी पहिला हप्ता म्हणून Non SC/ST- General व Capital साठी रु.७४४९.५० लक्ष, SCSP - General व Capital साठी रु. १६६९.०० लक्ष व TSP-General व Capital साठी रु.४२६.०० लक्ष असा एकुण रु. ९५४४.५० लक्ष (रुपये पंच्याण्णव कोटी चव्वेचाळीस लक्ष पन्नास हजार फक्त)

इतका निधी प्राप्त झाला आहे. वाचा ३ च्या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान योजनेसाठी नविन लेखाशिर्ष निर्माण करण्यात आलेली आहेत. तथापि, सदर लेखाशिर्ष अद्याप कार्यान्वीत झालेली नसल्यामुळे २०५३ ए १२६ या लेखाशिर्षाखाली प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या प्रमाणात राज्य हिश्श्याकरीता पहिला हप्ता म्हणून ४०% या प्रमाणात रु. ६३६३.०० लक्ष (रुपये त्रेसष्ठ कोटी त्रेसष्ठ लक्ष फक्त) इतका निधी B.D.S. वर उपलब्ध करुन State Nodal Officer, राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांना उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

<u>शासन निर्णय :-</u>

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान (RGSA) (६०:४०) या केंद्रपुरस्कृत योजनेसाठी राज्य हिश्श्याचा पहिला हप्ता म्हणून रु. ६३६३.०० लक्ष (रुपये रुपये त्रेसष्ठ कोटी त्रेसष्ठ लक्ष फक्त) इतका निधी [Non SC/ST- General व Capital साठी रु.४९६६.३३३ लक्ष (रुपये एकोणपन्नास कोटी सहासष्ठ लक्ष तेहत्तीस हजार तीनशे फक्त), SCSP - General व Capital साठी रु. १११२.६६७ लक्ष (रुपये अकरा कोटी बारा लक्ष सहासष्ट हजार सातशे फक्त) व TSP-General व Capital साठी रु.२८४.०० लक्ष (रुपये दोन कोटी चौऱ्याऐंशी लक्ष फक्त)] याप्रमाणे State Nodal Officer राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. वाचा येथील संदर्भ क्र. ५ अन्वये राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात आलेले आहे. तथापि, अद्यापही आहरण व संवितरण सांकेतांक प्राप्त झालेला नसल्याने उपरोक्त प्रमाणे वितरित करावयाचा निधी विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. उप आयुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय पुणे हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. उप आयुक्त (आस्थापना) यांनी संबंधित State Nodal Officer राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांना अनुदान वितरित करावे. State Nodal Officer राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांनी जिल्हा परिषदांना सदर निधी मंजूर वार्षिक कृती आराखडयाप्रमाणे वितरित करावा.

३. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून होणारा खर्च अत्यंत काटकसरीने केला जाईल याबाबत राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांनी व सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी. राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांना या योजनेसाठी उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार व उक्त संदर्भ क्र. ४ येथील केंद्र शासनाच्या पत्रातील सूचनांनुसार संबंधितांना वितरित करावा आणि वितरित केलेल्या निधीचा उपयोग योग्य प्रकारे होतो किंवा नाही याबाबत खातरजमा करुन होणाऱ्या खर्चावर नियंत्रण ठेवावे. निश्चित केलेली उद्दिष्ट व साध्य यासाठी झालेल्या खर्चाचा आढावा घेऊन शासनास तात्काळ अहवाल पाठवावा व खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्रदेखील सादर करावे.

४. या अनुदानातून State Nodal Officer राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांनी केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासणीचे अधिकार महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई आणि महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र - २, नागपूर यांना राहतील व त्यांना त्यांचे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित कार्यालय संपूर्ण सहकार्य करेल.

५. या शासन निर्णयाव्दारे मंजूर केलेल्या अनुदानातून होणारा खर्च मागणी क्र.एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन, ०९३ जिल्हा आस्थापना राज्य क्षेत्र, (०६) पंच, सरपंच, सचिव, अशासकीय सदस्यांना प्रशिक्षण, (०६)(०७) राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, ( राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम), लेखाशिर्ष क्र. २०५३A१२६, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ मध्ये मंजूर असलेल्या तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १५.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग ३ मधील अ.क्र.४ परि.२७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करुन, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सूचनांना अनुलक्षून तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौ.क्र.३३९/व्यय.१५, दि.२८.०६.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०६१६२०५९६९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

URMILA JOSHI

Digitally signed by URMILA JOSHI
DN: cn=URMILA JOSHI, o=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, ou, email=usyoj4.rdd-mh@nic.in, c=IN
Date: 2023.07.07 13:17:03 +05'30'

( उर्मिला जोशी )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता महाराष्ट्र विधानपरिषद/ विधानसभा, विधानभवन मुंबई.
५. मा.विधान सभा/ मा.विधान परिषद सदस्य (सर्व)
६. मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
७. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव
८. मा.अप्पर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक
९. मा.अप्पर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक
१०. मा.प्रधान सचिव (ग्राम विकास) यांचे स्वीय सहायक

११.मा.प्रधान सचिव (आदिवासी विकास) यांचे स्वीय सहायक
१२.मा. प्रधान सचिव (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांचे स्वीय सहायक
१३.मा.प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान) यांचे स्वीय सहायक
१४.विभागीय आयुक्त, पुणे
१५. राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे
१६.महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), बाणेर रोड, पुणे
१७.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१८. उप सचिव (सर्व) ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई
१९. वित्त विभाग (व्यय-१५/अर्थसंकल्प-१७) मंत्रालय, मुंबई-३२
२०. नियोजन विभाग (का.क्र.१४४४), मंत्रालय, मुंबई-३२.
२१. कार्यासन (वित्त-१), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई
२२. निवडनस्ती-आस्था-१५